नवीन महाविद्यालये (व्यावसायिक व पारंपारिक)/ विद्याशाखा/ अभ्यासक्रम/ विषय/ वाढीव तुकड्या मंजूरीसाठी संख्या निश्चित करणे व त्या अनुषंगाने अर्ज मागविण्याची कार्यपध्दती

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
शासन निर्णय क्रमांक एनजीसी २००९/ ( ३०१ /०९)/ मशि ४
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २५ सप्टेंबर, २००९

**शासन निर्णय :**

राज्यातील उच्च शिक्षणाचा दर्जा व गुणवत्ता वाढविण्यासाठी व तद्नुषंगिक बाबींसाठी महाराष्ट्र शासनाने "महाराष्ट्र विद्यापीठ कायदा, १९९४" अंमलात आणलेला आहे. महाराष्ट्र विद्यापीठ कायद्याप्रमाणे विद्यार्थ्यांचे शैक्षणिक हित जोपासण्याची व त्यांना उत्तम नागरीक घडविण्याची सर्व जबाबदारी विद्यापीठांची आहे. विद्यापीठ व त्यांच्या अधिनस्त सर्व महाविद्यालयांचे कामकाज सुरळीतपणे चालविण्यासाठी या कायद्यांतर्गत कुलगुरु, विद्यापीठातील सर्व अधिकारी / समित्यांना विविध अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत.

२ वर नमूद केल्याप्रमाणे कायद्यातील अपेक्षा व त्यापूर्तीसाठी केलेली व्यवस्था असतानांही शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, गेल्या काही कालावधीपासून विद्यापीठे व त्यांच्या अधिनस्त महाविद्यालयांकडून अनेक महत्वपूर्ण बाबींकडे पूर्णतः लक्ष देण्यात आलेले नाही. ज्यामुळे शिक्षणाचा दर्जा व गुणवत्ता खालावलेली आहे. उदाहरणार्थ :-

(i) बहुतांश अभ्यासक्रम अद्यावत करण्यात आलेले नाहीत.
(ii) NAAC व NBA कडून मुल्यांकन व मानांकन (Accredition) तसेच पुर्नमानांकन करुन (Reaccredition) घेण्यात आलेले नाही.
(iii) विद्यापीठांनी विकासाचा बृहत आराखडा तयार केलेला नाही/ अद्ययावत केलेला नाही.
(iv) अनेक महाविद्यालयांनी शासनाची पूर्व परवानगी न घेता नवीन अभ्यासक्रम / अतिरिक्त तुकड्या सुरु केलेल्या आहेत.
(v) बहुतांश महाविद्यालयांत नियमित प्राचार्यांची व अधिव्याख्यात्यांची नियुक्ती करण्यात आलेली नाही.
(vi) नवीन महाविद्यालये, विद्याशाखा, अभ्यासक्रम, विषय व तुकडीवाढीचे प्रस्ताव तयार करतांना महाराष्ट्र विद्यापीठ कायदा कलम ८२ मधील तरतूदींची योग्य ती अंमलबजावणी होत नाही.

वरील व अशाच काही शैक्षणिक गुणवत्तेवर परिणाम करणा-या बाबींबाबत संबंधित महाविद्यालय/ संस्थांवर महाराष्ट्र विद्यापीठ कायद्याच्या कलम ९१ खाली संलग्नीकरण किंवा मान्यता काढून घेण्यासारख्या कारवाई करुन गुणवत्ता अबाधित ठेवून ती प्रस्थापित करण्याची कार्यवाही केलेली नाही.

३. विद्यापीठ व त्यांच्या अधिनस्त महाविद्यालयांच्या कामकाजासंबंधी मा. राज्यपाल यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १५/११/२००८ रोजी झालेल्या कुलगुरुंच्या संयुक्त मंडळाच्या बैठकीत विद्यापीठ व त्यांच्या अधिनस्त

महाविद्यालयांचे कामकाज योग्य रितीने होत नसल्याबाबत चिंता व्यक्त करण्यात आली व यामध्ये सुधारणा करण्यासाठी योग्य ते पाऊल उचलण्यात यावे असा निर्णय घेण्यात आला.

**४. वर परि.३ मध्ये नमूद केल्यानुसार निदर्शनास आलेल्या बाबींची योग्य दखल घेऊन मा.राज्यपाल यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीत घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने सन २०१०-११ या शैक्षणिक वर्षासाठी विद्याशाखा व अभ्यासक्रम मंजूर करण्याच्या संदर्भात अर्ज मागविण्याची मर्यादा विहित करण्यासंबंधी व मंजूरीसाठीचे प्रस्ताव प्राप्त करून विद्यापीठांनी ते शासनास शिफारशित करण्यासंबंधी शासन पुढील प्रमाणे आदेश देत आहे :-**

४.१. महाराष्ट्र विद्यापीठ कायद्याच्या कलम ८२ मध्ये सर्व विद्यापीठांनी, विद्यापीठाच्या अधिकारीतेतील सेवारहित आणि न्यून विकसित क्षेत्राच्या गरजांचा योग्य तो विचार करुन, उच्च शिक्षणाच्या सुविधांचे समन्याय वाटप होण्याची सुनिश्चिती होईल अशा रीतीने, उच्चस्तर शिक्षणाच्या शैक्षणिक विकासाकरीता परिसंस्थांची आणि महाविद्यालयांची स्थाने निश्चित करण्यासाठी विद्यापीठ एक **सम्यक योजना** तयार करील आणि ती राज्य उच्च शिक्षण परिषदेकडून मान्य करुन घेईल, अशी तरतूद आहे. अशी योजना, महाविद्यालय व विद्यापीठ विकास मंडळाकडून तयार करुन आणि व्यवस्थापन परिषदेमार्फत ती योजना विद्यापरिषद आणि अधिसभा यांच्यापुढे ठेवणे आवश्यक आहे. गरजेनुसार विद्यापीठांनी आपआपल्या क्षेत्रासाठी तयार केलेल्या सम्यक योजना प्रतिवर्षी अद्ययावत करावयाच्या आहेत. सदर विद्यापीठ कायद्यातील तरतूदीनुसार सर्व विद्यापीठांनी त्यांच्या क्षेत्रासाठी सम्यक योजना तयार केलेली असावी व प्रतीवर्षी गरजेनुसार ती सुधारित केलेली असावी. **सदर सम्यक योजना सर्व विद्यापीठांनी गरजेनुसार सुधारित केली नसल्यास करावी किंवा ती तयारच केलेली नसल्यास तयार करुन राज्य उच्च शिक्षण परिषदेच्या मान्यतेसाठी शासनास दिनांक ५ ऑक्टोबर पूर्वी सादर करावी.** नवीन महाविद्यालये (व्यावसायिक व पारंपारिक)/ विद्याशाखा/ अभ्यासक्रम/ विषय/ वाढीव तुकड्या यांच्या आवश्यकतेचा विचक्षीत उल्लेख सम्यक योजनेमध्ये केलेला असावा.

४.२. प्रत्येक विद्यापीठांनी त्यांच्या क्षेत्रामध्ये ऑक्टोबर व मार्च मधील परिक्षांमध्ये इयत्ता १२ वी उत्तीर्ण होणारे विद्यार्थी, विद्यापीठ क्षेत्रामध्ये बाहेरुन येणारे विद्यार्थी, विद्यापीठ क्षेत्रामधून बाहेर जाणारे विद्यार्थी व इयत्ता १२ वी नंतर पुढे शिक्षण चालू न ठेवणारे विद्यार्थी याबाबतची आकडेवारी ठेवलेली असेलच. तशी ती ठेवली नसल्यास ती संकलित व संस्करित करुन त्याचा वापर Gross Enrollement Ratio वाढविणे, गुणवत्ता वाढविणे व उच्च शिक्षणाच्या सुविधा वाढविणे यासाठी सम्यक योजना तयार करतेवेळी करावा. इयत्ता १२वी उत्तीर्ण होणा-या विद्यार्थ्यांचे संख्येत होणारी वाढ व GER वाढविण्यासाठी केलेले नियोजन या बाबी वानगीदाखल नमूद केल्या आहेत. याशिवाय जर काही निकष विद्यापीठांना विचारात घ्यावयाचे असतील तर त्यांनी ते घ्यावेत, परंतु सर्व विद्यापीठांसाठी ते समान असावेत म्हणून सर्व विद्यापीठांच्या कुलगुरुंनी एकत्र येऊन ते निकष/parameter ठरवावेत व ते नमूद करुन त्या आधारे सम्यक योजना करावी.

४.३. विद्यापीठ क्षेत्रासाठी विविध प्रकारची महाविद्यालये, त्यामध्ये असलेल्या विविध विद्याशाखा, त्यामध्ये घेतले जाणारे विविध अभ्यासक्रम, त्यात शिकविले जाणारे विविध विषय व या

सर्वांसाठी मंजूर असलेल्या तुकडी याची तंतोतंत माहिती सम्यक योजना तयार करतांना विद्यापीठाने संकलित केलेली असेल. नसल्यास, तशी ती तयार करुन उपरोक्त सर्व बाबीमध्ये किती "प्रवेश क्षमता" आहे हे काढावे व ती सर्व माहिती संगणकीकृत करुन घ्यावी.

५. सम्यक योजनेत केलेले नियोजन व त्यापैकी शैक्षणिक वर्ष २०१०-११ मध्ये जेवढ्या नवीन महाविद्यालये (पारंपारिक व व्यावसायिक), विद्याशाखा, अभ्यासक्रम, विषय व वाढीव तुकड्या मंजूर कराव्या लागतील त्यांची संख्या विद्यापीठांनी ठरवून ती संख्या सम्यक योजनेसमवेत शासनाकडे सादर करावी.

६.

६.१ शैक्षणिक वर्ष २०१०-११ मध्ये वर परिच्छेद ५ मध्ये निश्चित केल्यानुसार अंमलबजावणीत आणावयाची योजना विचारात घेऊन (तीस तूर्त राज्य उच्च शिक्षण परिषदेची मान्यता आहे असे गृहित धरुन) त्या अनुषंगाने येणारी नवीन महाविद्यालये (पारंपारिक/व्यावसायिक)/ परिसंस्था, विद्याशाखा व अभ्यासक्रम मंजूरीची संख्या व ठिकाणे निश्चित करुन त्या तपशिलासह अर्ज मागविणारी जाहिरात सर्व विद्यापीठांनी करावी.

६.२ वर ६.१ मध्ये नमूद केल्यानुसार दिलेल्या जाहिरातीस प्रतिसादादाखल प्राप्त झालेल्या अर्जांची योग्य रितीने छाननी करण्याची विद्यापीठांची जबाबदारी असल्याने त्यांनी अर्जांची योग्य प्रकारे छाननी करुन प्रत्येक ठिकाण व बाबीसाठी तीनपेक्षा जास्त नाही एवढ्याच शिफारशी शासनाकडे कराव्यात व शिफारस करतांना विद्यापीठांनी प्राधान्यक्रम दर्शवू नये.

७. नवीन विषय व वाढीव तुकड्या मंजूरीच्या संदर्भात महाराष्ट्र विद्यापीठ कायदा कलम ८३ (५) अन्वये परवानगीची कार्यपध्दती राज्य शासनाने विहित करावयाची असून ती, विषय व तुकड्यांसाठी विद्यापीठ कायद्याच्या कलम ८२ प्रमाणेच शैक्षणिक वर्ष २०१०-११ साठी विहित करण्यात येत आहे.

८(अ). ज्या संस्था, वरीलप्रमाणे नवीन महाविद्यालये, विद्याशाखा, अभ्यासक्रम, विषय व वाढीव तुकड्या मंजूरीसाठी अर्ज सादर करतील व त्यांची यापूर्वीच महाविद्यालये अस्तित्वात आहेत, त्यांचेबाबतीत पुढील पूर्तता नसलेल्या संस्थांचे अर्ज शासनाकडे शिफारसीत करु नयेत.

८(अ).१. पात्र महाविद्यालयाचे बाबतीत नॅक/ एनबीए कडून मानांकन व मूल्यांकन तसेच पुनर्मानांकन करुन घेतले नसेल तर ;

८.(अ).२. ज्या संस्थांच्या महाविद्यालयातील प्राचार्यांसहित सर्व अध्यापकांची पदे अर्हताधारक व पात्र उमेदवारामधून नियमितरित्या भरलेली नसतील तर ;

८(अ).३.विद्यापीठाने विहित केलेल्या मूलभूत सुविधा उपलब्ध नसतील तर ;

८(ब). ज्या नवीन संस्था नवीन महाविद्यालयांसाठी अर्ज करतील, त्यांनी वरील ८.(अ) १ चे बाबतीत विहीत मुदतीत व ८.(अ).२ चे बाबतीत कार्यवाही त्वरीत करण्याधीन प्रस्ताव शिफारशीत करावा.

९. विद्यापीठांनी दिनांक ३१ ऑक्टोबर, २००९ पर्यंतच अर्ज स्विकारावेत. त्यानंतर प्राप्त होणारे अर्ज स्विकारण्यात येऊ नयेत. तसेच विद्यापीठाकडून छाननी करुन सदर प्रस्ताव दि. ३१ डिसेंबर, २००९ पूर्वी शासनास सादर करावेत. त्यानंतरचे प्रस्ताव शासनाकडून कोणत्याही परिस्थीतीत स्विकारले जाणार नाहीत.

१०. विद्यापीठांनी महाविद्यालयांकडून मान्यतेबाबतचे अर्ज मागवितांना इलेक्ट्रॉनिक्स पध्दतीने म्हणजेच व्ही. सी.डी. वर व नेहमीच्या पध्दतीने Hard Copy वर विद्यापीठांकडे सादर करण्याबाबतच्या सूचना जाहिरातीत देण्यात याव्यात. त्यामध्ये संस्थांमध्ये असलेल्या सोयी सुविधांचे व कर्मचारी / शिक्षक यांच्या विषयीचे व्हिडिओ चित्रीकरण असावे.

११. प्राप्त झालेल्या सर्व इलेक्ट्रॉनिक्स अर्जांवर योग्य ती प्रक्रिया करून विद्यापीठाचा एकत्र प्रस्ताव शासनास सादर करावा.

१२. शासनाकडे प्रस्ताव पाठवितांना नवीन पारंपारिक/ व्यावसायिक महाविद्यालये, अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात अतिरिक्त विद्याशाखा, व्यावसायिक अभ्यासक्रम व वाढीव तुकड्या असे वर्गीकरण करून प्रस्ताव तयार करावा व असा स्वयंस्पष्ट प्रस्ताव शासनास सादर करावा.

१३. अर्जदाराकडून प्रस्ताव मागवितांना ते फक्त DVBTT- Surekh या फॉन्टमध्येच स्वीकारण्यात यावा व याच फॉन्ट मध्ये शासनास सादर करावा.

हे आदेश, राज्य शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

(चि.गो. चावेकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रती,
संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व विभागीय सहसंचालक, महाराष्ट्र राज्य
सर्व कुलसचिव, अकृषी विद्यापीठे, महाराष्ट्र राज्य
मशि / विशि तील सर्व कार्यासने, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
निवडनस्ती मशि४

C:\Documents and Settings\ard\My Documents\Mashi x\Procedure -New college.doc